# कै. राजवाडे यांनीं लिहून ठेवलेली प्रस्तावना

" लक्ष्यताम्:—

[ १ ] पुढील भाषांतरांत ज्ञानेश्वरींतील ओव्यांतील मराठी शब्दांचें संस्कृत प्रतिशब्दशः भाषांतर दिलें आहे.

[ २ ] मजपुढें दोन पोथ्या अति जुन्या होत्या; ( १ ) मी छापिलेली व ( २ ) चांदोरकरांची पृष्ठमात्रांची.

[ ३ ] दृष्टि केवळ भाषाशास्त्रीय आहे.

*[ ४ ] पंच्याएशी ओव्यांचें ( १ ) संस्कृत भाषान्तर ( २ ) व अर्वाचीन मराठी भाषान्तर परिस्फुटतेकरितां व मोडणी कळण्याकरितां दिलें आहे. पुढील सर्व राहिलेल्या ओव्यांचें केवळ संस्कृत भाषान्तर तेवढें दिलें आहे.

[ ५ ] मराठी शब्दांचें संस्कृत भाषान्तर अशाकरतां दिलें आहे कीं त्या शब्दांचें मूळ संस्कृत रूप काय होतें तें अभ्यासकांच्या ध्यानांत यावें. कालिदासादि व पंचतंत्रादि सामान्य लेखकांच्या भाषेंत जे शब्द येतात त्याहून या भाषान्तरांत निराळे संस्कृत शब्द ( नामे, धातु व अव्ययें ) येतात हें अभ्यासकांच्या लक्षांत येईल.

[ ६ ] हें भाषान्तर अभ्यासितांना ( १ ) ज्ञानेश्वरी व्याकरण ( २ ) सुबंत विचार ( ३ ) तिङन्त विचार व ( ४ ) मराठी भाषेवरील माझे सर्व लेख, टिपणें व व्युत्पत्त्या यांशीं अभ्यासकाचा परिचय असणें अवश्य आहे. अन्यथा हें भाषान्तर नीट समजणार नाहीं व ८५ ओव्यांवर ज्या निर्वचक टीपा दिल्या आहेत त्यांतील विशेष कळण्यास अडचण पडेल.

[ ७ ] ८६ पासून ५३० पर्यंतच्या ओव्यांचें अर्वाचीन मराठी मुद्दाम केलें नाहीं. केवळ संस्कृत भाषान्तर केलें आहे अशाकरितां कीं ८५ ओव्यांची मोडणी कळल्यावर बाकीच्या ओव्यांचा अर्थ संस्कृत भाषान्तरावरून अभ्यासकाला करतां येईल व यावा.

वि. का. राजवाडे "

---

* टीपः—ग्रंथाची उपयुक्तता वाढविण्याच्या दृष्टीनें ८६ पासून ५३० पर्यंतच्या मराठी ओव्या आम्हीं मुद्दाम या ग्रंथांत दिल्या आहेत. सदरच्या ओव्या कै. राजवाडे यांनीं च छापविलेल्या ज्ञानेश्वरीच्या प्रतींत जशा छापल्या आहेत तशा च येथें उद्धृत केल्या आहेत.

चिटणीस, रा. सं. मं. धुळें

# संपादकीय निवेदन



कै. वि. का. राजवाडे यांनीं लिहून ठेवलेल्या या भाषान्तराचें महत्त्व ज्ञानेश्वरीच्या व साहीपेक्षां भाषाशास्त्राच्या अभ्यासकांना विशेष आहे हें जाणून राजवाडे-संशोधन-मंडळानें या भाषान्तराची प्रसिद्धी, मंडळामार्फत प्रकाशित होणाऱ्या 'संशोधन' त्रैमासिकांतून क्रमशः करण्यास सुरुवात केली व सर्व भाषान्तर त्रैमासिकांतून प्रसिद्ध झाल्यावर तें आतां या ग्रंथाच्या स्वरूपांत अभ्यासकांच्या हातीं देण्यांत येत आहे. या संस्कृत भाषान्तरांतील कांहीं रूपें व कांहीं व्युत्पत्त्या अशास्त्रीय आहेत असें कित्येक संस्कृतज्ञांना वाटलें व तीं रूपें व त्या व्युत्पत्त्या तशा च छापाव्या कीं काय असा प्रश्न उत्पन्न झाला. परंतु कै. राजवाडे यांनीं स्वतःच या भाषान्तराच्या प्रस्तावनेंत म्हटल्याप्रमाणें त्यांचे भाषाशास्त्रविषयक लेख उत्तम प्रकारें अभ्यासिल्याशिवाय या भाषान्तराचें मर्म नीट ध्यानांत येण्यासारखें नसल्यामुळें व तसा खोल अभ्यास आमचा किंबहुना उपरिनिर्दिष्ट आक्षेपकांचाही पण नसल्यामुळें कै. राजवाड्यांच्या लिखाणांत ढवळाढवळ न करितां तें आहे त्या च स्वरूपांत विद्वान् व अभ्यासू सज्जनांच्या स्वाधीन करणें हें च योग्य होईल असें ठरवून हें भाषान्तर जसेंच्या तसें च प्रकाशित केलें आहे. अर्थात् च मुद्रितें काळजीपूर्वक तपासण्यापलिकडे या ग्रंथांत संपादकाला विशेष कांहीं च कर्तव्य उरलेलें नव्हतें. हीं मुद्रितें तपासण्याचें काम राजवाडे संशोधन मंडळाच्या इच्छेवरून मीं केलें असून तें निर्दोष रीतीनें पार पाडण्याचा शक्य तो प्रयत्न यथाशक्ति केला आहे. शुद्धिपत्रांत नमूद केलेल्या मुद्रणदोषांखेरीज अधिक मुद्रणदोष या ग्रंथांत दिसून आल्यास त्याबद्दलची जबाबदारी केवळ माझ्यावर च आहे. या भाषान्तराच्या यथार्थतेबद्दल क्वचित् प्रसंगीं मतभेद होणें शक्य असलें तरी देखील तें भाषांतर व त्यासंबंधीं होणारी चर्चा ही भाषाशास्त्राच्या अभ्यासकांना अनेक दृष्टींनीं मार्गदर्शक होण्यासारखी आहे अशी मंडळाची दृढ श्रद्धा असल्यामुळें च मंडळानें कै. राजवाड्यांचें हें लिखाण जसेंच्या तसें च तज्ज्ञ जनतेला सादर केलें आहे.

धुळें मिती पौष शु॥ १
शके १८५६

त्र्यंबक व्यंकटेश कुळकर्णी
सभासद, रा. सं. मं. धुळें

# शुद्धिपत्र *



| पान | ओळ | अशुद्ध | |
|---|---|---|---|
| १७ | १४ | अधिक्य | आधिक्य |
| ,, | १७ | अभ्यासानें | अभ्यासान्तीं |
| १८ | २ | घोलिला | घोलिलां |
| ,, | ५ | ( मया ) मया | ( मया ) |
| ,, | ७ | मी | मीं |
| ,, | १९ | घाल्हितः | घल्हितः |
| १९ | ४ | घपनें | घपने |
| ,, | १९ | किंमा | किंवा |
| ,, | १८ | माहार्णे | घाहर्णे |
| २० | १ | आधिजवावें | ओधिजवावें |
| २१ | १४ | पडियन्ता | पढियन्ता |
| २२ | ४ | मंनोरथा | मनोरथां |
| २३ | ९ | उन्मेपः | उन्मेपः |
| ,, | १४ | लागलें | लागले |
| ,, | १७ | चारः = किंवा | चारः किंवा |
| २४ | ८ | घात्तीं | घार्ता |
| ,, | ९ | वेत्ति | वेति |
| ,, | २० | ( परंतु ) श्रोता दुश्चितः | (परंतु), श्रोता दुश्चित्तः |



* टीपः–तिसऱ्या फर्म्यांचें उपान्त्य मुद्रित ( प्रूफ ) च अखेरचें मुद्रित समजून छापलें गेल्यामुळें त्या फर्म्यांत वरील अशुद्धें राहिलीं आहेत.

श्री

# ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायांतील

## मराठी ओव्यांचें

# संस्कृत प्रतिशब्दशः भाषान्तर



## ज्ञानेश्वरी



## अध्याय नववा



॥ श्रीगणेशाय नमः ॥

( १ )

तरि अवधान एकलें देइजे । मग सर्व सुखांसि पात्र होइजे ।
हें प्रतिज्ञोत्तर माझें । उघड आइकां ॥

तरि = तर्हि. तर्‍हि = तर्हि + अपि.

एकल = एक + ल ( स्वार्थक ) ( ला–ली–लें ).

देइजे = कर्तरि विधिलिङ् किंवा कर्मणि विधिलिङ् दद्यात किंवा दीयेत.

देइजे = दीजे. मग = मार्ग्.

सर्वसुखां = चतुर्थी बहुवचन. सि = सं.

पत्र = राजपत्र; सनद.

घेइजे = गृण्हीयाम् किंवा गृह्येयम् ( कर्तरि किंवा कर्मणि विधिलिङ् )

हें = एतद्, इदम् व अदस् पासून तीन ह निघतात. पहिले दोन ह सन्निकृष्ट अर्थ दाखवितात व तिसरा ह विप्रकृष्ट अर्थ दाखवितो. प्रकृत स्थळीं सन्निकृष्टार्थक ह आहे. तेव्हां तो एतद् किंवा इदम् पासून निघालेला समजावा. हा, ही, हें.

प्रतिज्ञोत्तर = प्रतिज्ञया युक्त उत्तर. निक्षून उत्तर.

संविदागूः प्रतिज्ञानं ( अमर-प्रथमकांड-धीवर्ग-५ ).
प्रतिज्ञा पक्षोक्तिः प्रथितांगिकार श्च ( क्षीरस्वामी ).
उत्तर = प्रश्नः पोद्यधिया पृच्छा तस्य भंजनमुत्तरं, प्रतिवाक्यं.
माझ = मदीय. ह्या – झी – झें.
मम = मज्झ = मज हें तिन्ही लिंगीं सारखें.
मह्य = मज्झ = माझ. एका काळीं सं. षष्ठी मह्य अशी होती.
( प्रांतिक किंवा पूर्ववैदिक. )
उघड = उद्‌घट = उग्घट = ऊघड = उघड.
आइकां = आकर्णयत ( कर्तरि आज्ञायां लोट् द्वितीय पुरुष बहुवचन ).

संस्कृत

तर्हि एकलं ( एकाग्रं ) अवधानं दद्यात ।
माङ् सर्वसुखानां अहं पत्रं संगृण्हीयाम् ।
एतद् मदीयं उद्‌घटं प्रतिज्ञोत्तरं ( यूयं ) आकर्णयत ।

अर्वाचीन मराठी

तरी एकाग्र अवधान तुम्ही द्या; ( म्हणजे ) मग मी सर्व सुखांची राजपत्र ऊर्फ सदन घेईन. हें माझें उघड प्रतिज्ञोत्तर ऐका, म्हणजे प्रतिज्ञापूर्वक प्रतिवाक्य आइका. प्रतिज्ञापूर्वक म्हणजे पक्षोक्तिपूर्वक.

भावार्थ

आपण माझें बोलणें एकाग्र चित्तानें ऐका; म्हणजे मला सर्व सुखांची सनद च मिळाली असें मी समजेन; आपलें होकारार्थी वाक्य आलें म्हणजे तत्संबंधानें मी प्रतिज्ञेनें असें उघड उत्तर करितों कीं, सर्व सुखांची म्हणजे सुखातिशयाची मला साक्षात् आपणाकडून जणूं काय सनद च मिळाली.

( पाठभेद चांदोरकरप्रतः—पात्र होईजे म्हणून अर्वाचीन शुद्धि कोणीं केली आहे. पण हा पाठ अनर्थक आहे. )

( ३ )

परि प्रौढि न बोलें हो जी । तुम्हां सर्वज्ञाचां समाजीं ।
देयां अवधान म्हणे हे माझी । विनवणी सलगी ॥

परि = परं अपि = परं भि = परं हि = परं इ = परिं = परि. पर = परं
प्रौढि = तृतीया किंवा द्वितीया. प्रौढि म्हणजे वृद्धवत् उक्ति.
न = न. बोल = वल्ह = वल्ह = वल्ल = बोल

अ चा ओ. वल्हामि = बोलें ( लट् परस्मै अनिट् )

हो = हो. जी = आर्याः ।

तुम्हाँ = युष्माकं = तुम्हँ = तुम्हहँ = तुम्हाँ.

सर्वज्ञा = षष्ठी बहुवचन. ज्ञ मधील अनुनासिकामुळे बहुवचनाचा अनुस्वार काढला नाहीं.

चां = च या सर्वनामाची सप्तमी एकवचन.

त्यत् = च्चत = च ( चा, ची, चें )

समाजीं = सप्तमी एकवचन. देयां = लोट् द्वितीय पुरुष बहुवचन.

अवधान = द्वितीया एकवचन. म्हणे = ( भण् = म्हण् ) लट् उत्तम पुरुष एकवचन. परस्मै अनिट्.

( किंवा ) म्हणे ! = निपात, मन्ये = म्हणे !

हे = एतद्, अदस्, इदम् ह्या तीन सर्वनामांपासून स्त्रिलिंगी रूप, प्रथमा एकवचन. ही हें रूप अर्वाचीन आहे.

माझी = मदीया.

विनवणी = विज्ञापना किंवा विनमनी किंवा विज्ञपन

विज्ञापना = विनावणी. विनमनी = विनवणी.

विज्ञपना = विनवणी

तेव्हां दुसरी व्युत्पत्ति रूपावरून एथें ग्राह्य वाटते.

सळगी = संलग्ना किंवा त्याहून उत्तम सहलग्ना.

संलगना = सळगी. सहलगना = सळगी.

सं चा अनुस्वार मराठींत उडून जातो, हें लक्षात ठेवण्यासारखें आहे. तं सं ताडयति – त्यास मारतो. षष्ठी किंवा तृतीया.

सलगी = संलग्ना किंवा सहलग्ना विशेषण विनवणीचें.

संस्कृत

परं अपि प्रौढ्या किंवा प्रौढिं न वल्हामि अहो आर्याः

युष्माकं सर्वज्ञानां त्यस्मिन् समाजे ।

अवधानं दत्त ( इति ) भणामि ।

इयं मदीया संलग्ना विज्ञापना किंवा विनमनी । किंवा

इयं मदीया विज्ञपना संलग्ना ( अस्ति ) ।

अर्वाचीन मराठी

परंतु, अहो आर्यजन हो ! मी प्रौढी किंवा प्रौढीनें तुम्हां सर्वज्ञाच्या समाजात बोलत नाहीं. अवधान द्या म्हणतों, ही माझी सलगीची विनवणी आहे. किंवा ही माझी विनवणी ( आपल्या चरणाशीं ) संलग्न आहे.

भावार्थ

१ प्रौढी म्हणजे वृद्ध पुरुषा सारखें बोलणें चालणें, लहान तोंडीं मोठा घास घेणें.

२ पाठभेद चांदोरकरप्रतः—परि × तरि; × चां × ०; समाजीं × समझि. पैकीं परि व समाजीं हे पाठ सरस. समज म्हणजे परीचा यथा असा संस्कृतांत अर्थ आहे. नंतर समाझि असा पाठ फिरविला आहे. परंतु झि हून जिं किंवा जीं उच्चार सरस. चांदोरकर प्रतींत सप्तमीचा अनुनासिक नाहीं. )

३ म्हणे हा निपात समजला नाहीं तर कंसवाक्य समजतां येईल.

( ३ )

कां जे ललेयाचे लले सरति । मनोरथाचे मनौरे पुरति ।
जरि माहेरें श्रीमंतें होंति । तुझा ऐसीं ॥

कांजे = किंच.

ललेया = लला शब्दाचें षष्ठीचें एकवचन

ललक = ललअ = लला ( ळी-ळें ). ललक = लडक (का-की-कें)
लला म्हणजे मूल किंवा ललक म्हणजे लाड.

चे = च या सर्वनामाचे प्रथमेचें बहुवचन.

लले = ( लल: = लला ) बहुवचन. लला म्हणजे लाड.

सरति = लट् प्रथम पुरुष बहुवचन, परस्मैपद, अकर्मक सर् म्हणजे प्राप्त होणें. सृ = सर् To finish.

मनोरथा = षष्ठी एकवचन.

मनश्चासौ रथश्च मनोरथः । मन एव रथः । मनरूपी रथ.

चे = च चें प्रथमेचें बहुवचन.

मनौरे = मनौरा शब्दाचें प्रथमेचें बहुवचन.

मनस्कार = मनोआरा = मनौरा.
चित्ताभोगो मनस्कारः । ( अमर-प्रथमकांड-धीवर्गः—२ )
पुनः पुनः मनसि करणं मनस्कारः चर्चा विचारणा ।

पुरति-प्रथमपुरुष बहुवचन, परस्मैपद, अकर्मक. पृ = पुर.

जरि = जन्हि. जर्‍हीं = जन्हि अपि.

माहेरें = प्रथमा बहुवचन. मातृगृहाणि = माहेरें.

मात्रीयकाणि = माहेरें ( मामा ) मातरा ( Parents )
Vaidik = मातरा माहेरें - Parents.

श्रीमंतें = बहुवचन माहेरें या शब्दाचें. श्रीमंत-श्रीमंतें.

होंति—लट् प्रथमपुरुष बहुवचन.　　　　भू = हो.
तुम्हा—षष्ठी.　　　　ऐसीं = ईदृशानि किंवा एतादृशानि.
( किंवा ) तुम्हाऐसीं = युष्मादृशाणि. युष्मादृश = तुम्हाऐस
युष्मादृश या तद्धित शब्दाचा च अपभ्रंश तुम्हाऐस असा होतो.

संस्कृत

किंच ललकानां त्ये लला: सरंति ।
मनोरथस्य त्ये मनस्कारा: पूर्यन्ते
यन्हि युष्मादृशाणि श्रीमन्ति मातापितरौ भवतः
( मातृगृहाणि भवंति )

अर्वाचीन मराठी

आणीक, मुलांचे ते ते लाड सिद्ध होतात, किंवा लळ्यांचे लळे सरतात, भागविले जातात. ( व ) मनाचे ते ते संकल्प पुरविले जातात, जेव्हां तुम्हा सारखीं श्रीमंत आईबापें असतात.

भावार्थ

येथें चंचल मुलें व मन यांचे लाड प्रेमळ मातापितरें पुरवितात, हा दृष्टान्त घेतला आहे.

( ४ )

तुमचेया दीठिवेयाचिये खोलें । सांसिनले प्रसन्नतेचे मलें ।
ते साउली देखोनि लोलें । श्रांतु जी मी ॥

तुमचेया = युष्मदीयस्य पुल्लिंगी तुमचा या शब्दाची षष्ठी.
तुम्हेच्चअ = तुमच ( चा-ची-चें )
दीठिवेया = दृष्टिपात = दीठिवाअ = दीठिवा. षष्ठी दीठिवेया.
चियें = ची ह्या स्त्रीलिंगी सर्वनामाची सप्तमी एकवचन.
खोलें = क्रोडा = कोला = खोला सप्तमी एकवचन खोलें.
सांसिनले = निष्ठा बहुवचन.
संसिन्व् म्हणजे चांगलें भिजणें.
संसिन्वित = सँसिवअ + ल = सँसिवल, सँसिनल.
सँसिनले म्हणजे चांगले भिजलेले.
प्रसन्नते = षष्ठी प्रसन्नतायाः ( किंवा ) प्रसन्नतीयाः = प्रसन्नतेचे.
मे = प्रथमा बहुवचन.

मळे = मालाः = मळे-प्रथमा बहुवचन.

ते = द्वितीया एकवचन स्त्रीलिंग त या सर्वनामाचें.

साउली = शामा + ली =साँवली ( छाया )= साउली किंवा छाया +ली ( स्वार्थक ) = साअली = सावली = साउली.

देखौनि देखौनु = दृष्ट्वा.

लोले = लोलामि. लट् उत्तमपुरुष एकवचन.

लोलें = लोळें ( अर्वाचीन ).

श्रांतु = श्रांत. जी = आर्याः मी = अहं.

संस्कृत

युष्मदीयस्य दृष्टिपातस्य त्यस्यां क्रोडायां
प्रसन्नतायाः त्ये मालाः संसिन्विताः ।
तां छायां दृष्ट्वा, हे आर्याः अहं
श्रांतः ( सन ) लोलामि ।

अर्वाचीन मराठी

तुमच्या दृष्टिपाता च्या खोळींत प्रसन्नतेचे मळे भिजले आहेत. ती सावली पाहून दमलेलो मी, हे आर्य हो ! लोळतों.

भावार्थ

१ चांदोरकरप्रतींत देखौनु असा पाठ आहे. ज्ञानेश्वरानें मूळ देखौनि रूप लिहिलें कीं देखौनु रूप लिहिलें, हा निश्चय करवत नाहीं. दोन्ही रूपें त्या काळीं सरसहा सर्वत्र प्रचलित होतीं. नकलकारांपैकीं एकानें देखौनु व दुसऱ्यानें देखौनि रूप लिहिलें आहे. ज्ञानेश्वरानें दोहोंतून कोणतें तरी एक च रूप लिहिलें असलें पाहिजे. उघड आहे कीं, दोहोंतून कोणत्या तरी एका नकलकारानें यदृच्छेला जें सहज रूप आलें तें लिहिलें आहे. म्हणजे नकलकार फार पुरातन काळीं म्हणजे ज्ञानेश्वराच्या हयातींत किंवा लवकर च नंतर जरीं ज्ञानेश्वरानें मूळांत रूपें लिहिलीं असतील तशींच रूपें लिहीत नसत, हें निश्चित आहे.

२ सिन्व् धातु प्राथिक संस्कृतांत दृष्टीस पडत नाहीं. तो मराठी रूपानें ज्ञानेश्वरींत साक्षात् योजिलेला आहे. त्यावरून व इतर अशा च उदाहरणांवरून दिसतें कीं पाणिनीय धातुपाठांतील सिन्व् वगैरे धातु काल्पनिक नाहींत, पाणिनिकालीन लोकांच्या नित्य परिचयांतील आहेत.

३ चांदोरकरप्रतींत मि वर अनुनासिक आहे. प्रस्तुत प्रतींत नाहीं. अर्थात् अनुनासिक वैकल्पिक आहे.

४ चांदोरकरप्रतींत खोलेबद्दल ओले हा पाठ आहे. त्याहून खोले हा पाठ सरस व अर्थाला अनुरूप. ओलावा म्हणजे आर्द्रता व सांतिनले म्हणजे आर्द्र झाले. द्विरुक्ति एका च अर्थाची टाळण्याकरितां खाले हा पाठ स्वीकारावा हें श्रेयस्कर. ख मधील व घेऊन ओले, वोले, हा पाठ निहिलेला दिसतो.

( ५ )

तुम्हीं सुखामृताचे डोहो। म्हणौनि आपुलिया सवें वोल्हावों लाहों।
आणि एथ ही सलगि करुं जरि बीहों। तरि निवों कें पां ॥

तुम्हीं – यूयं. सुखामृता = पष्ठी. चे = बहुवचन.

डोहो = द्रुह = डोह, डोहो. बहुवचन; द्रुह म्हणजे तडाग.

म्हणौनि = मत्वा. आपुलिया = आत्मीयायाः ( आत्म्यायाः ) पष्ठी.

सवें = समता = सवआ = सवा; सवें-सप्तमी एकवचन स्त्रीलिंग.

वोल्हावों = आर्द्रायितुं. आर्द्र = ओल. उद् To wet उत्त + ल = ओल नामधातु.

लाहों = श्लाघानि. लोट् उत्तमपुरुष एकवचन.
श्लाघ् = लाह् ( अत्युत्कट इच्छा करणें. )

आणि = अन्यत्. एथ = अत्र. ही = अपि.

सलगि = सहलग्नता. करुं या धातुसाधित नामाचें कर्म.

करुं = कर्तुं. करु या नामाची द्वितीया एकवचन. बिहों या क्रियापदाचें कर्म.

जरि = यन्हि. बीहों = बिभयानि – लोट् उत्तम पुरुष एकवचन.

तरि = तन्हि. निवों = निर्वाणि. लोट् उत्तमपुरुष एकवचन.

कें = क सर्वनामाची तृतीया एकवचन. पां=त्वै =त्वइ=पैं, पां ( निपात )

संस्कृत

यूयं सुखामृतस्य द्रुहाः ।
( इति ) मत्वा आत्मीयायाः समतायां आर्द्रायितुं श्लाघानि ?।
अन्यच्च अत्र अपि सहलग्नतां कर्तुं यन्हि बिभयानि ।
तन्हि केन ( प्रकारेण ) त्वै निर्वाणि ?।

अर्वाचीन मराठी

तुम्ही सुखामृताचे डोह, म्हणून आपल्या सवें ( अथवा संगतींत ) ओलावूं इच्छूं कां ? आणि एथें हि जर सलगि करण्यास भिऊं, तर कोणत्या प्रकारानें ( मी ) निवूं वरें ?

भावार्थ

१ संतप्तातें निवण्याची कल्पना येथें आहे व सर्वत्र ओवींत आशार्थ (प्रश्नार्थ ? सं. ) आहे. सुखामृताच्या डोहांत मज्जन करून शांत होण्याची परवानगी ज्ञानेश्वर संतांपाशीं मागत आहे.

२. आपुलिया सवें ह्या पाठाचा अर्थ न कळल्यामुळें आणि स्वेच्छा, आपुलिया स्वेच्छा, असे सहज समजण्यासारखे पाठ अवान्तर प्रतींनीं घातले आहेत.

( ६ )

आणिक बाल बोवडां बोलीं । कां वांकुडां विचुकीं पाउलीं ।
चोज करूनि माउली । रिझवी जेवि ॥

आणि = अन्यत्      बालक = बालकं.

बोवडां = बोबल ( बल् धातूचें यङि रूप ) = बोवड – बोवडा – डी – डें. बोवडा या पुल्लिंगी आकारान्त शब्दाचें तृतीयेचें बहुवचन बोवडां. बल् – बोलणें, बोल हा मराठी बल्ह् पासून हि निघेल व बल् पासून हि निघेल.

बोलीं = ( बल्ह् किंवा बल् ) तृतीया बहुवचन.

कां = किंवा = कॅंवा = कॅंआ = काँ.

वांकुडां = वक्रट = वांकुड ( डा – डी – डें ) तृतीयेचें बहुवचन अकारान्त शब्द.

विचुकीं=(महाराष्ट्री) विचुक=विचुक, तृतीयेचें बहुवचन अकारान्त शब्द. विचुक म्हणजे चुकणारें, अडखळणारें. ( महाराष्ट्री ) चुक्क म्हणजे चुकणें.

पाउलीं=पाद + ल = पायल = पाउल. तृतीयेचें बहुवचन.

चोज = चोद्य ( चमत्कार, आश्चर्य, कौतुक ) = चोज्ज = चोज कर्म करूनि शब्दाचें.

माउली = मातृ + ली ( स्वार्थक ) = माउली.

रिझवी = ऋच् = रिज – किंवा ऋजु – ऋजु करणें, खेळवून शांत करणें. ( णिच् ) रिजव ऋच् म्हणजे पूजा करणें; लट् प्रथम पुरुष एकवचन सेट्.

जेवि = यद्वत्

संस्कृत

अन्यच्च बंबलितोक्तिभिः किंवा वक्रटैः भ्रमद्भिः
पादन्यासैः चोद्यं कृत्वा यद्वत् मातरं बालकं अर्जयति ।

### अर्वाचीन मराठी

अशोक, ज्याप्रमाणें बोबड्या बोलांनीं किंवा मोडक्या तिडक्या पावलांनीं कौतुक करून आईस लेंकरूं रिझवितें.

### टीका

लेंकरूं बोबडें बोलून व अडखळत चालून कौतुकानें आपल्या आईस रिझवितें; हा दृष्टान्त येथें घेतला आहे.

### ( ७ )

**तेवि तुम्हां संतांचा पढियो । कैसेनि तन्हीं आम्हावारि हो ।**
**इया बहुवा अळुकी जी आहों । सलगि करित ॥**

तेवि = तद्वत्. तुम्हां = षष्ठी बहुवचन.
संतां = सतां. चा = प्रथमा एकवचन.
पढियो = प्रतिग्रहः = पढिवो = पडिहो = पढियो
प्रतिग्रह म्हणजे प्रेम, मर्जी. प्रथमा एकवचन.
कैसेनी = कीदृशेण. तन्हीं = तर्हि अपि.
आम्हा = षष्ठी बहुवचन. वरि = उपरि.
हो = भवतु. इया = अनया.
बहुवा = बह्व्या.
अळुकी = आर्तिका = आलिकी = आलुकी = अळुकी
आर्ति म्हणजे अत्युत्कट इच्छा, संकट. तृतीया एकवचन.
जी = आर्याः आहों = स्मः
सलगि = संलग्नता किंवा सहलग्नता. करित = कुर्वन्तः

### संस्कृत

तद्वत् कीदृशेन तर्हि अपि ( उपायेन ) युष्माकं सतां प्रतिग्रहो भवतु अनया बह्व्या आर्त्या, हे आर्याः,
वयं संलग्नतां कुर्वन्तः स्मः ।

### अर्वाचीन मराठी

तेणेंप्रमाणें कशानें तरी तुम्हां संतांचा प्रतिग्रह होवो या मोठ्या उत्कंठेनें आम्ही, हे आर्य हो, सलगी करीत आहों.

( ८ )

वांचूनि माझिये बोलतिये योग्यते । सर्वज्ञ भवादृश श्रोते ।
काइ घडेयावरि सारस्वतें । पढों सिकिजे ॥ ८ ॥

वांचूनि = वंचित्वा, वंचित्वा.
माझिये = मदीयायै चतुर्थी.
बोलतिये = वदन्त्यै चतुर्थी.
योग्यते = योग्यतायै चतुर्थी.
सर्वज्ञ = सर्वज्ञाः
भवादृश = भवादृशाः
श्रोते = श्रोतारः
काइ = किं.
घडेया = घटस्य; घट, घटी म्हणजे पाटोळी, वस्त्र, फडकें.
वरि = उपरि.
सारस्वतें = सारस्वतेन.
पढों = पठितुं.
सिकिजे = शिक्ष्येत शिक्षिष्ये.

संस्कृत

मदीयां वदन्तीं योग्यतां वंचित्वा
भवादृशाः श्रोतारः सर्वज्ञाः ।
किं घटस्य उपरि सारस्वतेन पठितुं शिक्ष्येत ? ।

अर्वाचीन मराठी

माझ्या बोलण्या योग्यते शिवाय आपल्या सारखे श्रोते सर्व कांहीं जाणतात. विद्वानानें वस्त्रावरील लिहलेल्या वाचायला शिकावयाचें ?

टीका

ज्ञानेश्वरकाली घट, घटी म्हणजे कापडाचा फडक्या घर लिहून मुलांना वाचण्याकरितां किंवा घालून देत. जोगाईच्या अंबराय पंचीकरणाचोर्डो दांतोपंतानें फडक्यावर च लिहिलेली आहे. ती शिवा, वाचकें व अज्ञान याचा साठी आहे.

( ९ )

अवधारां आवडे तेसणा धुंधुरु । परि महातेजीं न मिरवे काई करुं ।
अमृताचां ताटीं वोगरुं । ऐसिं रसोयें कैंचीं ॥

अवधारां = अवधारयत.
आवडे = यावृत्तवे.
तेसणा = तादृशः तादृशीनः
धुंधुरु = धुंधुमारः
परि = परं.
महातेजीं = महति तेजसि.
न = न.
मिरवे = शोभवि किंवा मिळिरापसे.

काइ = किं.
अमृता = अमृतस्य.
तार्टी = तट्टे, ताळे.
ऐसें = एतादृशाणि.
कैंचीं = कानिचित्.

करूं = करवाणि.
च्या = त्वस्मिन्.
घोगरं = उद्गिराणि.
रसोयें = रससूदनानि.

संस्कृत

अवधारयत ( यादृशः ) युष्मभ्यः आवर्तते तादृशीनः
धुंधुमारः ( यन्हि स्यात् ) परं महातेजसि न
समुन्मीलति ( न मिहिरायते ); किं करवाणिः
अमृतस्य त्वस्मिन् ताळे ( यादृशाणि ) उद्गिराणि
एतादृशाणि रससूदनानि कानिचित् ( संति ) ?

अर्वाचीन मराठी

ऐकलीत च्या, वाटेल तसला धुंधुमार असला तरि महातेजांत अमोच्या शेजारी तो मिरवत नाहीं,' ( म्हणून ) काय करूं ? अमृता च्या तारांत वाहूं अशीं रसोयें कांहीं तरी ( आहेत ) ?

टीका

१ धुंधुरु बद्दल चांदोरकरप्रतींत धुंधरु पाठ आहे.
२ काय करूं हें कंसवाक्य आहे.
३ मिहिर म्हणजे सूर्य. मिहिरायतें म्हणजे सूर्यासारखें चमकणें.
  मिहिरायते = मिरवतो.
४ वाहृत म्हणजे आवडणें. वाहृत = वावड = आवड. वाह्रति = आवडि

( १० )

हां हो हिमकरा वीजणें । किं नादापुढां आइकवणें ।
लेणेंयासि हें लेणें । केहीं आहे ॥

हां हो ! = हंहो !
वीजणें = वीजनं.
नादा = नादस्य.
आइकविणें = आविष्कर्णनं.

हिमकरा = हिमकराय.
किं = किंवा.
पुढां = पुरस्तात्.
लेणेंयां = रत्नेभ्य

सि = सं. हें = इदं.
लेणें = रत्नं. केहीं = कुत्रापि. आहे = अस्ति.

संस्कृत

हंहो ! हिमकराय वीजनं किंवा
नादस्य पुरस्तात् आविकर्णनं
( किंवा ) रत्नेभ्यः इदं रत्नं कुत्रापि सं अस्ति ?

अर्वाचीन मराठी

हा हो चंद्राला पंखा किंवा नादापुढें आइकविणें ( किंवा ) लेण्याला हें चांगलें लेणें कोठें हि आहे का ?

टीका

चां. आहे × आधि. रत्न = रदण — लयण = लेणें.
लयन पासून लेणें शब्द निघतो. त्याचा अर्थ घर असा आहे. डोंगरांत राहावयाची गुहा असा त्याचा विशिष्ट अर्थ आहे.

( ११ )

सांघां परिमळें काइ तुरंबावें । सागरें कवणी ठाइं नाहावें ।
हें गगन चि अडे आघवें । ऐसा पवाडु कैंचा ॥

सांघां = संख्यात. परिमळें = परिमलेन.
काइ = किं. तुरंबावें = तुंपितव्यं.
सागरें = सागरेण. कवणीं = कस्मिन् नु.
ठाइं = स्थाने. नाहावें = स्नातव्यं.
हें = अदः गगन = गगनं.
चि = चित्. अडे = अड्डेत्.
आघवें = आग्निमं. ऐसा = ईदृशः
पवाडु = प्रवारः कैंचा = कश्चित्.

संस्कृत

संख्यात, परिमलेन किं तुंपितव्यं ?
सागरेण कस्मिन् नु स्थाने स्नातव्यं ?
अदः चित् गगनं आग्निमं ( येन ) अड्डेत्
ईदृशः प्रवारः कश्चित् अस्ति ?

अर्वाचीन मराठी

दोना, बांडानें फळाचा वास घ्यावा ? डागानें कोणत्या स्थळीं घरें न्हावें ? या अशक्या समाळाला अवश्रीड असें छत काहीं तरी आहे काय ?

( १२ )

**तैसें तुमचें अवधान धाए । आणि ह्मणों हें देखों होये ।**
**ऐसें वक्तृत्व कवणातें आहे । विचारिजो ॥**

| | |
|---|---|
| तैसें = तादृशं. | तुमचें = युष्मदीयं |
| अवधान = अवधानं ( द्वितीया ). | धाए = धीयते. |
| आणि = अन्यत्. | ह्मणों = भणामः |
| हें = इदं. | देखों = पश्यामः |
| होए = भवति. | ऐसें = एतादृशं. |
| वक्तृत्व = वक्तृत्वं. | कवणा = कं नु. |
| तें = प्रति. | आहे = अस्ति. |
| विचारिजो = विचार्यतां. | |

संस्कृत.

तादृशं ( तद्वत् ) युष्मदीयं अवधानं धीयते
अन्यच्च,( यत् वयं ) भणामः( तद् ) एतत् पश्यामः (इति) भवति,
एतादृशं वक्तृत्वं कं नु प्रति अस्ति ? विचार्यतां ?

अर्वाचीन मराठी

तसें तुमचें अवधान ( जेणेंकरून ) घातलें जातें आणि ( जें आम्ही ) म्हणतों ( तें ) हें ( साक्षात् ) पहातों ( असें ) होतें, असें वक्तृत्व कोणास आहे बरें ? विचार करा ?

टीका

धा हा धातु येथें अकर्मक म्हणजे कर्मण्यर्थक योजिला आहे. जशी आकाशाला गवसणी घालण्याचा विचार केला आणि ती घातली गेली त्या प्रमाणें तुमच्या अवधानाला मी गवसणी घातली आणि मी म्हटलें तें प्रत्यक्ष करून दाखविलें असें जेणेंकरून होईल असें वक्तृत्व कोणापाशीं आहे काय ? असा भावार्थ.

( १३ )

**तऱ्हीं विश्व प्रकाशितेया गभस्ती । हातियेवेनि किजे काइ आरती ।**
**कीं चूळोदकें अपांपती । अर्घ्यू न दीजे ॥**

हाथिवेनि = हस्तवर्तिकया, हस्तवर्त्तेन.

संस्कृत

तर्न्हि आपि विश्वप्रकटयित्रे गभस्तये
हस्तवर्तिकया आरातिः क्रियेत किं ? ।
किंवा चुळुकोदकेन अपांपतये
अर्घ्यः न दीयेत ? ।

अर्वाचीन मराठी

तरी विश्वप्रकटणाऱ्या सूर्याला हातांतील वातीनें आरति दाखवावी की ? किंवा चुळुकभर पाण्यानें समुद्राला अर्घ्य देऊं नये की ?

टीका

१ पहिल्या वाक्यांत विधिप्रश्न आहे व दुसऱ्या वाक्यांत निषेधप्रश्न आहे.

२ विश्वप्रकटितेया असा समास घ्यावा; किंवा विश्व प्रकटितेया असा अन्वय घ्यावा. दोन्ही तऱ्हा व्याकरणशुद्ध आहेत.

( १४ )

प्रभू तुम्ही महेशाचिया मूर्ती । आणि मीं दुबळें अर्चितसें भक्ती ।
म्हणौनि बोलु जर्न्ही गंगावती । तर्न्ही स्वीकाराल ॥

अर्चितसें = अर्चयन् अस्मि. म्हणौनि = मत्वा.
गंगावती = ( गु शब्दे ) गोङ्गूयन्ते = गोंगावती = गंगावती

गंगावणें हें पौनःपुन्यवाचक क्रियापद आहे.
गंगावणें म्हणजे अस्पष्ट नाकांत उच्चार करणें.

संस्कृत

प्रभवः ! यूयं महेशस्य स्याः मूर्तयः ।
अन्यच्च अहं दुर्बलः भक्त्या अर्चयन्नस्मि ।
( इति ) मत्वा जर्न्हि मम वल्हनानि गोङ्गूयन्ते ।
तर्न्हि ( तानि ) स्वीकरिष्यथ ।

अर्वाचीन मराठी

प्रभूंनो ! तुम्ही महेशाच्या मूर्ती ( आहांत ) आणि मीं थोडेंसें भक्तीनें अर्चीत आहे; म्हणून जरी माझे बोल अस्पष्ट असले तरी ( ते तुम्ही ) स्वीकाराल.

टीका

१ दुर्बलः = दुष्टुं वलति (वक्ति) इति दुर्बलः दुर्बल म्हणजे अस्पष्ट बोबडें बोलणारा. दुर्बल म्हणजे अशक्त असा एथें अर्थ नाही.

२ गंगावती म्हणजे निर्गुंडीचा पाला, असा कित्येक अर्थ करितात; परंतु तो मायेच्या अज्ञानानें तसा करितात.

३ बोल्ल हें बहुवचन आहे.

(१५)

बाल बापाचां ताटीं रिगे। रिगौनि बापातें चि जेवउं लागे।
किं तो संतोषाचेनि वेगें। मुख ओडवी॥

रिगे = रिंगति. ओडवी = उपपोदयति, अवकर्षयति.
लागे = लगते.

संस्कृत

बालः वप्तुः त्यस्मिन् ताले रिंगति।
रिंगित्वा वप्तारं चित् (एव) प्रति जेमयितुं लगते।
किंवा सः संतोषस्य त्येन वेगेन।
(वप्तुः) मुखं अवकर्षयति।

अर्वाचीन मराठी

बाळ बापाच्या ताटांत (रांगत जातो) रिंगतो (=शिरतो) रांगून जाऊन बापाला च जेवूं लागतो किंवा तो संतोषाच्या वेगानें (आपलें) तोंड ओढवी;

(१६)

तैसा मी जन्हीं तुह्माप्रति। चावटें करितसें बालमती।
तन्हीं तुह्मीं संतोषिजे ऐसी चि जाति। स्नेहाचि एया॥

चावटें = चर्वितता, चर्वणं    चवं = चाव; चाव + ट = चावट.

संस्कृत

तादृशः अहं बालमतिः अस्मि युष्मान् प्रति
चर्वितचर्वणं कुर्वन् अस्मि।
यर्हि यूयं संतुष्येत एतादृशी चित् (एव)
स्या जातिः एतस्य स्नेहस्य।

अर्वाचीन मराठी

तथा बालमती मी तुझा पत जरि तोंचतें बोलणें करीत आहे, तरी तुम्हीं संतोष ( च ) मानीत असावें अशी च हा सेहा ची जात आहे.

टीका

चर्पट ( पंजरी ) = चावट ( पांजरी )

चर्व व चर्प हे दोन्ही धातु एकार्थक असावे व चर्प हें चर्व चें एक रूप आहे. चर्प धातु पाणिनीय धातुपाठांत नाही.

( १७ )

आणि तेणें आपुलेपणाचेनि मोहें । तुम्हीं संत घेतले आहा बोंहें । म्हणौनि कलिये सलगिचा नोहे । भारु तुम्हां ॥

घेतले = गृहीताः  बोंहें = भूतेन.

संस्कृत

अन्यच्च, तेन आत्मीयतायाः स्येन मोहेन
भूतेन यूयं संतः गृहीताः स्थ
( इति ) मत्वा कृतायाः सहलग्नतायाः स्यः भारः
युष्मभ्यः न भवति ।

अर्वाचीन मराठी

आणि त्या आपलेपणाच्या मोह ( रूपी ) भूतानें तुम्ही संत पछाडले आहां; म्हणून केल्या सलगी चा तुम्हांला भार होत नाही.

टीका

१ भूतेन = भूतें = भूएँ = बोंहें

२ बृहदारण्यकोपनिषदांत पतंचलाची भार्या गंधर्वगृहीता होती म्हणून वर्णिलेली आहे, तेथें गृहीत या शब्दाचा अर्थ पछाडलेली असा आहे. तो च अर्थ येथें घेतल या शब्दानें ज्ञानेश्वरांनी दर्शविला आहे

( १८ )

आहो तान्हेयांची लागे झटे । तरि तेणें आधिकें चि पान्हा फुटे । रोसें प्रेम दूणावटे । पढियंतेयाचेनि ॥

तान्हा = तृष्णः  झटे = झटति:, झटा. झट् संघाते.
पान्हा = पृष्णः  फुटे = स्फुटति, स्फोटते.

दुणावटे = द्विगुणो वर्तते किंवा वर्धते.   अधिकें = आधिक्येन.

संस्कृत

अहो ! तृष्णानां त्या झटी ( यन्हि ) लगति
तन्हि तया आधिक्येन चित् पृष्णः स्फोटते ।
प्रतिगृह्यमानस्य त्येन रोषेण प्रेमा द्विगुणो वर्धते ।

अर्वाचीन मराठी

अहो ! तान्हां ची झटी ( जेव्हां ) लागते तेव्हां तिणें आधिक्यानें च पान्हा फुटतो. आवडल्या त्या रोषानें प्रेम दुणावतें.

टीका

१ तृष्ची निष्ठा तृष्ट अशी होते. परंतु तृष्ण असें हि एक निष्ठारूप असावें. त्या खेरीज मराठी तान्हा हा शब्द व्युत्पादितां येणार नाहीं. तृष्ण हें रूप प्राकृत संस्कृत असावें.

२ पान्हा हा शब्द पा पिणें या धातू पासून व्युत्पादिण्याचा मोह पडण्याचा संभव आहे. पण तशी गोष्ट नाहीं. पृष् सेचन करणें या धातू पासून पृष्ण असें प्राकृत निष्ठारूप तृष्ण प्रमाणें च होत असावें व त्या पृष्ण रूपापासून मराठी पान्हा शब्द झालेला आहे, यांत संशय नाहीं.

३ अधिकें ही तृतीया आहे. संस्कृत आधिक्य या भाववाचक नामापासून मराठी अधिक हें भाववाचक नाम होतें. विशेषण अधिक व भाववाचक नाम अधिक या दोन्ही शब्दांचीं रूपें ज्ञानेश्वरकालीन मराठींत सारखीं च दिसतात. परंतु सूक्ष्म अभ्यासानें त्यांचें भिन्नत्व ओळखितां येतें.

४ द्विगुणायते या नामधातूपासून दुणावणें हा मराठी धातू निघतो. दुणावटणें हा मराठी धातु द्विगुणः वर्तते किंवा वर्धते या दोन संस्कृत शब्दांपासून निष्पन्न झालेला आहे. द्विगुणीभू पासून दुणा-णी-णें होणें; आणि द्विगुणीकृ पासून दुणा-णी-णें करणें हे शब्द मराठींत निपजतात.

५ झटी म्हणजे संघात, भीड.

( १९ )

म्हणौनि मज लेंकुरुवाचेनि बोलें । तुमचें कृपालुपण निदैलें ।
चेइलें हें जी जाणावलें । एया लागि बोलिलां ॥ १९ ॥

लेंकुरूं = ललकतर = लें॑कभर = लेंकर = लेंकरूं.
निदैलें = निद्राणं.   चेइलें = चेतितं.

जाणीयेलें = आज्ञातं ( पौनःपुन्यें ).
बोलिला = वल्हितवान्. इति = हें.

संस्कृत

इति मत्वा मम लल्कततरस्य स्येन वल्हितेन
युष्मदीयं कृपालुत्वं निद्राणं चेतितं
इति, हे आर्याः ! (मया) मया आज्ञातं । एतस्मिन् लग्ने वल्हितवान् ॥

अर्वाचीन मराठी

म्हणून मज लेकरा च्या बोलानें तुमचें निजलेलें कृपालुपण चेवलें हें, आर्य हो !, उत्कटरसानें ( मी ) जाणिलें. ह्या करितां बोलिलों.

टीका

१ ह्या धांतूचें निद्राण होतें. परंतु द्राण पासून निदैल हें रूप होणें शक्य नाहीं. तेव्हां दुसरा पक्ष असा राहातो कीं, द्रा चें एक प्रांतिक रूप द्रात असें होत असावें. निद्रात + ल = निद्रातल = निदायल = निदैल.

किंवा निद्रा या नामापासून निद्रित असें विशेषण होतें. निद्रित + ल = निदिमल = निदैल.

२ ज्ञा पासून जाण् हा धातु निघतो. ज्ञाय (कर्मणि) पासून ये (मध्या च्यार्पण येतें) ह्या कर्मणि धातु निघतो. ज्ञापय पासून जाणविणें हा प्रयोजक धातु निघतो. ज्ञाप्यते ( कर्मणि, भावे ) पासून जाणवणें हें भावें रूप मराठींत होतें. आणि जाज्ञायते ( पौनःपुन्य ) पासून मराठींत जाणावणें हा धातु निघतो.

३ ( क्त निष्ठा ) वल्हित = बोलिल ( ला – लो – लें ) ( क्तवति निष्ठा ) वल्हितवत् = बोलिलें ( लों–ल्यो–ल्यें ) पहिलें कर्मणि व कर्तरि आहे; दुसरें नुसतें कर्तरि आहे. वाल्हितः अस्मि = बोलिलों.

४ इति = इइ = ए = हें इति पासून निघालेलें हें निपात आहे. हें, हें सदा नपुंसकलिंगी असतें व अव्यय असल्यामुळें विभक्तिकार्याक्षम आहे.

( २० )

यन्हवि चांदिणें पिकविजत आहे काइ चेंपणीं ।
किं चांरेया घापत आहाति पाणी ।
हां हो गगनां गवसणी । शोधिजतसे ॥

यन्हवि = इतरथा हि. पिकविजत = पच्यमानं.
चेंपणीं = चयने, चेंपने. घापत = भाम्यमाणानि, आंदोलमानानि.

आहाति = हंति, भ्राम्यति, प्राणीं = वानानि.
गवसणी = गवाक्षायनं. गुंफिजतसे = गुम्फ्यमानं अस्ति.
वातरः = वावरा = वारा.

संस्कृत

इतरथा हि , किं चंद्रकीलं चपनें प्राप्यमानं अस्ति ?
किंवा वातराय वानानि ग्राभ्यमानानि संति किं ?
हंहो ! गगनाय गवाक्षायनं गुम्फ्यमानं अस्ति किं ?

अर्वाचीन मराठी

एरवीं चांदणें चेपणीत ( दाबून ) पिकविलें जातें का ? किंवा वाऱ्याला वाहण्याला वाहनें घेववितां येतील काय ? अहो ! गगनाला गवसणी गुंफिली जाते काय ?

टीका

१ चांदिणें हा शब्द चंद्रकील या शब्दापासून झाला आहे. चंद् धातूपासून चंद्न हा शब्द घावला तर त्यापासून मराठी चांदणें शब्द होईल, चांदिणें शब्द होणार नाहीं. चंद्रमस् पासून चांदवा शब्द होतो. चांदिणें या शब्दांतील इ सिद्ध होण्याकरितां इकारयुक्त चंद्रकील शब्द च घेतला पाहिजे. चंद्रकिरणांना दडपून पिकवितां येईल काय ? असा प्रश्न ज्ञानेश्वर करितात.

२ चि-चपयति पासून चपनं, त्या पासून चेपणें. चि चयने संवरणें.

३ पापत हें रूप प्राप्यमाण या णिचि कर्मणि रूपापासून निघणें शक्य नाहीं. ग्रहापयति-ग्रहाप्यते पासून पापत रूप निघेल. किंवा प्रभू-प्राभय्-प्राभ्यमाण पासून पापत रूप निघेल.

४ वा गतिगंधनयोः वान म्हणजे वाहाणें.

५ गवाक्ष पासून गवास, गवश रूप होईल, गवसणी रूप होणार नाहीं. वातायनं प्रमाणें गवाक्षायनं असा शब्द मूळांत प्रचारांत असावा. त्यापासून गवसन ( पुल्लिंग ) व गवसणी ( स्त्रिलिंग ) शब्द निघालेले दिसतात. गवाशन हा शब्द मराठींत आहे. गवासणी असा मूळ मराठी उच्चार.

६ वारा हा शब्द वात शब्दापासून निघालेला नाहीं. वात पासून वाअ, वाय शब्द निघतो. वातरः शब्दापासून वारा शब्द निघालेला आहे. वातर म्हणजे प्रकर्षानें वाहणारा किंवा जाणारा.

( २१ )

आइकां यापरि बोथिजवातें न लगे । नवनीतीं माथुला न लगे ।
लाजिलों आरवाणुं न निगे । देखौनि जेयातें ॥

ओथिंवणें = उत्स्तेमनीयं.  आथिजवावें = अवस्त्यातव्यं.
माथुळा – मंथः + स्वार्थे ल = मँथुला = माथुला.

संस्कृत

आविकर्णयत, ( यद्वत् ) पानीयं अवस्त्यातव्यं न लगति
नवनीते मंथः न लगाते
( तद्वत् ) यं दृष्ट्वा ( अहं ) लज्जितः सन् व्याख्यातुं न निर्गे ॥

अर्वाचीन मराठी

ऐका ( जसें ) पाण्याला ( मुद्दाम ) पातळ करावें लागत नाहीं; लोण्यास घुसळणें लागत नाहीं; ( तसें ) ज्या गीतार्थाला पाहून लाजलेला मी व्याख्यान करण्यास प्रवृत्त होत नाहीं.

टीका

१ चादोरकरप्रतींत ओथिंवणें असा पाठ आहे. तो स्तिम् – स्तीम् धातूपासून निघालेला आहे, हें उघड आहे. आथिजवावें हें रूप अवस्त्यातव्यं या रूपापासून होतें. अव + स्त्ये चें आथिज रूप होतें. स्त्याय ( ति ) – थिज्.
२ ओथिजलें शब्दा करितां ६५ वी ओंवी पाहा.

( २२ )

हें असो शब्दब्रह्म जिये वाजे ।
शब्दु मावळलेयां निवांत निदिजे ।
तो गीतार्थु मऱ्हाटिया बोलिजे ।
हा पाडु काइ ॥

वाजे = वद्यायां, वाद्यायां.
मावळलेया = म्लापित = मालव = मावल = मावळ
म्लापित = मावलल
म्लापिते = मावललेयां
पाडु = पारः ( पारय् सामर्थ्ये ).  निवांत – निवातं.

संस्कृत

अस्तु एतत्; शब्दे म्लापिते यस्यां वाद्यायां शब्दब्रह्म
निवातं निद्रायात् सः गीतार्थः महाराष्ट्र्या वल्हेत,

( २१ )

( किंवा त्वं गीतार्थं महाराष्ट्रीद्वारा अहं वल्हेयम् )

एषः कः पारः ॥

अर्वाचीन मराठी

हें अहो, शब्द मावळल्यावर शब्दब्रह्मानें ज्या वाहना वर निवांत निजावें तो गीतार्थ मराठीद्वारा सांगितला जावा किंवा मी वोलावा, हा काय पाड आहे !

टीका

१ वह्य, वाह्य म्हणजे रथ वगैरे वाहन.

२ म्लै ( णिच् ) पासून मालवणें व मावळणें हे दोन धातू निघतात. म्लै पासून मालणें.

३ निवात या शब्दांतील वा वर अनुस्वार किंवा अनुनासिक ज्ञानेश्वराच्या काळा पासून च आहे.

( २३ )

परी ऐसा ही मज धिंवसा। तो पुडुतीं एया चि एकी आशा।
जें धीटीवं करूनि भवादृशां। पढियंतेयां होआवें॥

धिंवसा = अध्यवसाय. पुडुतीं = पुरस्तात्.
धींटीव = धृष्टिमा ( भाववाचक )
पढियन्ता = प्रीयमाणः = प्रीयन्तः = पढियंता Favoured, loving, being loved.

संस्कृत

परमपि, एतादृशः अपि मम अध्यवसायः।
सः पुरस्तात् एनया चित् एकया आशया।
यत् धृष्टिमानं कृत्वा भवादृशेभ्यः प्रतिगृह्यमानेन
( प्रीयमानेन ) ( मया ) भवितव्यं।

अर्वाचीन मराठी

परंतु, असा हि माझा निश्चय किंवा प्रयत्न आहे तो पुढें ह्या च एका आशेनें कीं, धीटीव करुन आपल्या सारख्यांना म्या प्रिय व्हावें.

टीका

जें = यत् निपात आहे.

( २४ )

तरि आतां चंद्रापासौनि निववितें ।
जें अमृता ही हूनि जिवविते ।
तेणें अवधानें कीजो वाढतें ।
मनोरथा माझेया ॥

पासौनि = पश्चात् ( पंचमी )　　　　　आतां = अथो.
निवविते = निर्वापयत् ( नपुंसक ).
कीजो = लोट् कर्मणि क्रियताम्.

संस्कृत

तर्हि अथो चंद्रात् ( अपि यत् ) निर्वापयत्तरं,
यत् अमृतात् अपि जीवयत्तरं,
तेन अवधानेन मदीयं मनोरथं वर्धमानं क्रियताम् ।

अर्वाचीन मराठी

तरी आतां ( जें ) चंद्राहून निववितें, ( व ) जें अमृताहून हि जीववितें, त्या अवधानानें माझ्या मनोरथाचें वर्धन केलें जावो.

टीका

१ चंद्रा पासौनि = चंद्रस्य पश्चात्. हौनि हूनि हे प्रत्यय पश्च पासून निघालेले आहेत.

चंद्रा षष्ठी आणि पासौनि पश्चात्‌ची पंचमी. किंवा चंद्रा द्वितीया आणि पश्चयित्वा म्हणजे चंद्राला पुढे मागून सारून, पलीकडे टाकून म्हणजे चंद्रापेक्षा अधिक चांगले जिववितें.पार्श्वी = पश्चे. पार्श्व, आर्श्व वगैरे शब्दां पासून याची आजवर मी व्युत्पत्ति करीत होतों; परंतु पश्च शब्दा पासून व्युत्पत्ति खरी.

२ भृ-भर पासून मराठींत भरती ( भृतिः ) व भरतें ( भ्रियमाणं ) अशी नामें होतात. त्या प्रमाणें वृध् पासून वृद्धिः ( वाढ ) व वर्धमानं ( वाढतें ) ही नामें होतात. वाढ म्हणजे भूतक्रियासंपन्न नाम आहे व वाढतें हें वर्तमानक्रियादर्शक नाम आहे. रडतें, पडतें, भरतें, वाढतें, हीं मराठींत वर्तमानक्रियादर्शक नामें आहेत.

( २५ )

कां जें दीठिवा तुमचा वर्षे । तें सकळार्थसिद्धी मति पीके ।
एऱ्हवीं कोंभैला उन्मेखु सुके । जरि उदास तुम्हीं ॥

कां = कस्य हेतोः

संस्कृत

कस्य हेतोः, यदि युष्मदीयः दृष्टिपातः वर्षति
तदा सकलार्थसिद्धिः मतिः पक्वायते
इतरथा यन्हि यूयं उदासो. ( तन्हि )
कुंइमलितः ( अपि ) उन्मेषः शुष्यति ।

अर्वाचीन मराठी

का की, जेव्हां तुमचा दृष्टिपात वरसतो तेव्हां सकलार्थां ची सिद्धि ( करणारी ) मती पक्व होते, एरवीं जर तुम्ही उदास ( असला ) तर कोंभेजलेला ( हि ) उन्मेष सुकून जातो .

टीका

कुंव् म्हणजे ( वनस्पतींचीं मुळें ) आच्छादणें ( झाड वाढावें म्हणून ) = कोंभ
कुंमित + ल = कोंभियल = कोंभेल ( ला-ली लें ) मतीचीं मुळें रुजत घातलेलीं तुमच्या उदासीनतेमुळें शुष्क होतात.

कोंम, कोंब या शब्दाचा अर्थ 'झाडांचें प्राथमिक किंचित् खालीं गेलेलें व किंचित् जमिनीवर आलेलें 'मूळ. मग नंतर वर आलेल्या नव्या फांद्यांचे पेर्‍यां कोंब, कोंम म्हणूं लागले.

( २६ )

साहाजें तन्हीं अवधारा । वक्तृत्वा अवधानाचा होये चारा ।
तैं दोंदें पेलति अक्षरां । प्रमेयांचिं ॥

चारा = चार = किंवा चर्व
दोंदें = तौन्द्यं. पेलति = पीड्यंति.

संस्कृत

तान्हि अवधारयत, ( यदा ) वक्तृत्वाय
अवधानस्य चर्वः भवति,
तदा अक्षरेभ्यः प्रमेयानां त्यानि तौन्द्यानि
साहाज्येन पीडयंति ।

अर्वाचीन मराठी

तरी लक्षांत घ्या कीं, जेव्हां वक्तृत्वाला अवधानाचा चारा होतो म्हणजे मिळतो, तेव्हां अक्षरांना प्रमेयांचीं दोंदें सहज पेलतात.

टीका

१ चर् म्हणजे चारणें व चर्व् म्हणजे खाणें. दोहीं पासून हि चारा शब्द निघेल. चर्व = चावणें, च्याव्या, चावा वगैरे शब्द चर्व पासून निघालेले आहेत.

२ पील् = पेल. पील म्हणजे गर्दी करून खेंचणें.

( २७ )

अर्थु बोलाची वाट न पाहे। तेथ अभिप्राउ चि अभिप्रायातें विये।
भावांचा फुल्लौरा होंतु जाये। मती वरि ॥

वाट = वार्ता. फुलौरा = फुल्लपूरः
विये = वी — वेति.

संस्कृत

( यत्र ) अर्थः वल्हितस्य वार्ता न प्रार्थयाति
तत्र अभिप्रायः चित् अभिप्रायं प्रति वेत्ति।
भावानां स्यः फुल्लपूरः मत्याः उपरि भवन् जायते (च)।

अर्वाचीन मराठी

जेथें अर्थ बोला ची वाट पाहात नाहीं तेथें अभिप्राय च अभिप्राया तें वितो, (व) भावांच्या फुलोरा मती वर होत जातो.

टीका

जन् = जायते ( कर्तरी ). जन् = जन्यते, जायते ( कर्मणी )

( २८ )

म्हणौनि संवादाचा सुवाओ ढळे। तरि हृदयाकाश सारस्वतें ओ्ले।
श्रोता दुचिता तरि वितुळे। मांडला रसु ॥

म्हणौनि = माङ् नूनं. ढळे = भ्रणति.
सुवाओ = सुवातः वितुळे = वितुळ्यते.

संस्कृत

माङ् नूनं ( यन्हि ) संवादस्य त्यस्य सुवातः भ्रणाति
तन्हि हृदयाकाशं सारस्वतेन अवळीयते।
( परंतु ) श्रोता दुश्चितः ( भवेत् ) तन्हि मंडितः ( आपि ) रसः वितुळ्यते.

अर्वाचीन मराठी

मग, जर संवादा चा सुवास दळला तर हृदयाकाश हास्यतानें भरलें जातें. ( परंतु ), श्रोता दुश्चित ( होईल ) तर मांडला रस नितुळतो ( मोडून जातो ).

टीका

अवळी = चिकटणें. येथें थोळे हें क्रियापद अवळी पासून निघालेलें घेणें युक्त आहे. आर्द्र पासून ओलें हें विशेषण निष्पन्न होतें व आर्द्रयते पासून ओलावतें हें क्रियापद निघतें.

( २९ )

आहो चंद्रकांतु द्रवता किरु होये। परि ते हातवटी चंद्रिं किं आहे। म्हणौनि वक्ता चि वक्ता नव्हे। श्रोतेंनि विण ॥

हातवटी = हस्तपाटवं, हस्तपटुता.

संस्कृत

अहो! चंद्रकांतः द्रवन् किल भवति,
परं सा हस्तपटुता चंद्रे किल अस्ति।
( इति ) मत्वा वक्ता चित् श्रोतॄन् विना।
वक्ता न भवति ॥

अर्वाचीन मराठी

अहो! चंद्रकांत द्रवता होतो खरा, पर ती हस्तपटुता चंद्रांत असते की– म्हणून श्रोत्यां विना वक्ता ( हा ) वक्ता च होत नाही.

( ३० )

परि आतां आमुतें गोंदां करावें। ऐसें तांदुळिं काइसेयां विनवावें। साईखेडेनि कां प्रार्थावें। सूत्रधारातें ॥

साईखेडेनि = स्वामिखेलकेन.

संस्कृत

परं अथो ( युष्माभिः ) अस्मान् प्रति गुडीकर्तव्यं
ईदृशं तंडुलैः कीदृशाय (कारणाय) ( किमिति ) ( कस्मिन्नर्थे )
विज्ञापितव्यं ( किंवा विनमितव्यं )
सूत्रधारं प्रति स्वामिखेलेन प्रार्थितव्यं किं ?

अर्वाचीन मराठी

पर आतां आमचे घास कसाचे असें तांदुळांनीं विनवावयाला कां हवें. वायखेळानें सूत्रधाराला कां प्रार्थावें ?

टीका

१ गोव्यभर मात दिवाला म्हणजे संपलें = घास भर मात इ. इ. इ. गोव्य = घास. गोळा = गोळा.

गुड म्हणजे घास, तोंडांत मावेल असा घास. भाताचा गोळा खाऊन निघालों.

२ स्वामिखेल या नांवाचा सूत्रधाराचा बाहुल्यांचा एक खेळ.
स्वामिखेल = सांईखेड
खेळानें खेळ करा म्हणून सूत्रधाराला विनवावें कां लागतें ?

( ३१ )

तो काइ बाउलेयांचां काजा नाचवी ।
किं आपुलिये जाणिवेची कळा वाढवी ।
म्हणौनि आम्हां येया ठेवाठेवी ।
काइ काज ॥

पुत्तळ = पुत्तल = पुअल = बउल = बाहुल ( ला-ली लें )
ठेवाठेवी = स्थेयास्थेयता. स्थेयः म्हणजे दोन पक्षकारांत निवाडा करणारा न्यायाधीश. कायद्यांतील पारिभाषिक शब्द आहे. स्थेय + अस्थेय; तस्य भावः स्थेयास्थेयता.
जाणिव = ज्ञानमत्ता, ज्ञानिमा.

संस्कृत

किं सः पुत्तलानां त्यस्मै कार्याय ( कार्यार्थे ) ( तान् ) नर्तयति ?
किंवा आत्मीयायाः ज्ञानमत्तायाः त्यां कलां वर्धयति ?
( इति ) मत्वा अस्मभ्यं एतया स्थेयास्थेयतया किं कार्यं ?

अर्वाचीन मराठी

की तो बाहुल्यां चा हितार्थ ( त्यांना ) नाचवितो ?
किंवा आपल्या ज्ञानमत्ते ची कला वाढवितो ?
असें मनन करून आम्हाला या ठेवाठेवीचें काय कार्य आहे ?

( ३२ )

तवं गुरु म्हणाति काइ जालें । हें समस्त ही आम्हां पातलें ।
परि आतां सांघें जें बोलिलें । नारायणें ॥

पातलें = प्राप्तं. तवं = तदा.
तैं = तदि. जैं = यदि.

संस्कृत

तदा गुरवः भणंति, किं जातं ?
इदं समस्तं अपि अस्मान् ( प्रति ) प्राप्तं,
परं अतः संख्याहि यत् नारायणेन वल्हितं ।

अर्वाचीन मराठी

तंव गुरु म्हणतात, काय झालें ? हें समस्त हि आम्हा ला पावलें. आणि आता जें नारायणानें म्हटलें तें सांग.

टीका

अतः = आतां ( आतुडें )

( ३३ )

एथ संतोखेंसीं निवृत्तिदासें । जी म्हणौनि उल्हासें ।
अवधारां कृष्णु ऐसें । बोलते जाले ॥

संस्कृत

अत्र संतोषेण सह उल्हासेन निवृत्तिदासेन आर्याः (इति) अभण्यत
अवधारयत कृष्णाः ( कृष्णपादाः ) एतादृशं वल्हन्तः अस्ताः

अर्वाचीन मराठी

एथें संतोषा सह उल्हासानें निवृत्तिदासानें जी म्हटलें ; एक्य या. कृष्ण असे बोलते जाले.

टीका

१ अभण्यत = म्हणें + इ = म्हणौनि. ओवी ४२ पहा.

२ बोलते जाले. अस् चें वर्तमानकालवाचक सात म्हणून होतें. उदाहरणार्थ, होत सात. या सात चें अर्वाचीन रूप जात. होत जात ( तो–ती–तें ). अस् चें भूतकालवाचक अस्त असें रूप पुरातन पूर्ववैदिक काली होतें. अर्वाचीन पूर्ववैदिक काली अस्त चें स्त असें रूप झालें. नंतर वैदिक व पाणिनीय काली तें रूप शिष्ट भाषेंतून लोप पावलें. परंतु पाणिनीय व वैदिक कालीन प्राकृत किंवा

जातिक भाषांत स्त हें रूप विद्यमान होतें. त्या प्रांतिक म्हणजे महाराष्ट्री व मराठी ह्यांच्या पूर्वज संस्कृत कालीन भाषेंतील स्त चें प्राकृतांत सत असें निष्पन्न जालें. सत + ल = सभ + ल = जाल ( ला-ली-लें ). अशा परंपरेनें मराठींत जाल हें रूप आलें. म्हणजे आह किंवा अस या धातूचें भूतकालवाचक धातुसाधित जाल हें आहे व वर्तमानकालवाचक धातुसाधितें सात व जात हीं आहेत.

२ कृण्णु हें बहुवचन आहे.

( ३४ )

अर्जुना हें चि बीज । पुढती सांघिजैल तूज ।
जें अतष्करणिचें गुज्ञ । जिवाचिये ॥

संस्कृत

अर्जुन ! इदं चित् बीजं पुरतः त्वां ( प्रति ) संख्यास्यते,
यत् ( बीजं ) जीवस्य त्यस्मिन् अंतःकरणे स्थं गुह्यं ।

अर्वाचीन मराठी

अर्जुना ! हे च बीज तुला पुढें सांघिजेल, जें ( बीज ) जीवा च्या अंतःकरणी स्थित ( असें ) गुह्य आहे.

टीका

१ अंतःकरणे स्थ = अंतःकरणीं च. हे दोन शब्द अगदीं निराळे आहेत. अंतःकरणस्थ = अंतःकरणिच. एथें समास आहे. चिये हें सर्वनामरूप सप्तमीचें असून त्याचें विशेष्य अंतःकरणि हें सप्तम्यन्त च रूप असलें पाहिजे. म्हणून एथें अंतःकरणे स्थ अशीं व्यस्त पदें पाहणें भाग आहे.

( ३५ )

एणें मानें जिवाचें हियें फोडावें । मग गुज कां पां मज सांघावें ।
ऐसें कांहीं स्वभावें । कल्पिसि जरि ॥

संस्कृत

अनेन मानेन जीवस्य त्यत् हृद् स्फोटितव्यं,
माङ् गुह्यं मां ( प्रति ) किं त्वे संख्यातव्यं ?
एतादृशं ( ईदृशं ) किंचिदपि यन्हि स्वभावेन कल्पसे;

अर्वाचीन मराठी

ह्या मानानें जीवा चें हृदय फोडावें ( आणि ) मग मला गुह्य कां बरें सांगावें ? असें कांहीं स्वभावतः जरी कल्पसील;

टीका

हृद् = अंतःकरण ( वरील ओंवी पहा ).

( ३६ )

तरि परियसैं प्राज्ञा । तूं आस्थेची संज्ञा ।
बोलिलिये गोठी अवज्ञा । नेणसि करुं ॥

संस्कृत

तर्न्हि पर्याशृणु प्राज्ञ ! त्वं आस्थायाः स्या संज्ञा आसि;
वल्हितायाः गोष्ठ्याः अवज्ञां कर्तुं न जानासि ।

अर्वाचीन मराठी

तरी परीस शहाण्या ! तूं आस्थे ची संज्ञा आहेस; बोलल्या गोष्टी ची अवज्ञा करणें जाणत नाहीस.

( ३७ )

म्हणौनि गूढपण आपुलें मोडो । वरि बोलणें हीं बोलावें घडो ।
परि आमचिये जीविचें पडो । तूझां जीविं ॥

संस्कृत

इति मत्वा, आत्मीयं गूढत्वं मोट्यताम्,
उपरि, वल्हनं आपि वल्हितव्यं घट्यताम्,
परं, अस्मदीयं जीवस्थं त्वदीये जीवे पतताम् ।

अर्वाचीन मराठी

म्हणून, आपलें गूढपण ( मोडलें तर ) मोडो, वरतो, बोलणें हि बोलावें ( लागलें तरी तें हि ) घडो, पर आम च्या जीविंचें तुझ्या जीवीं पडो.

( ३८ )

आगा थानीं कीरु दूध गूढ । परि थानासी चि न्हवे किं गोड ।
म्हणौनि सरो कां सेवितेयाची चाड । जरि अनन्यु मिळे ॥

आगा = अंग.   चाड = पटुता.

संस्कृत

अंग ! किल स्तने दुग्धं गूढं अस्ति,
परं स्वनाय चित् किल ( तत् ) गुडः न भवाति

( इति ) मत्वा, सेवितुः किल त्वां चटुतां स्मरामः
यन्हि अनन्यः ( सेविता ) भिल्यते।

अर्वाचीन मराठी

आगा ! यानांत दूध गूळ असतें खरें, पर यानाला च कांहीं त्याची गुळणी होत नाहीं. ह्मणून ( दूध ) सेवन करणाऱ्याची चाड वाटते, जर अनन्य सेवन करणारा मिळेल.

टीका

किल = किर, किंर, कीर, कीं, कां-इतके अपभ्रंश एका किल शब्दाचे होतात.

( ३९ )

मूढांहूनि बीं काढिलें। मग निरोलिलिये भुइं पाखिरिलें।
तरि तें सांडीविखुरी गेलें। ह्मणों ये काइ॥

मुढा = मूतः = , मूतक·

मूत ह्मणजे बांधलेला गठ्ठा. पाटी.

मू ( बंधने मूतः = मूढा = मुढा.

निरोलिलिये = निर्वापितायां, निर्वलितायां.

पाखिरिलें = प्रकीर्णं.

सांडी = स्यंदनी, संदा, स्यंदी, स्यन्दू-प्रस्रवणें.

विखुरी = विक्षुरी.

संस्कृत

मूतकेभ्यः बीजं कर्षितं माङ् निर्वापितायां भूमौ प्रकीर्णं;.
तन्हि तत् स्यंदनविक्षुरणेन गतं ( इति ) भणितुं ईयेत किं ?

अर्वाचीन मराठी

मुढ्यांतून बी काढिलें ( आणि ) मग मशागत केलेल्या नांगरलेल्या भूमींत पाखरिलें; तर तें सांडीविखुरी वारी गेलें ( असें ) ह्मणूं येईल काय ?

टीका

१ विष्किर पासून विखिरणें होईल. क्षुरप्र ( खुरपें ) यांत क्षुर शब्द आहे. सबब विक्षुर पासून विखुर शब्द निघालेला समजणें युक्त आहे.

२ ईयेत ( कर्मणि ) ह्या क्रियापदाचा अर्थ संभवणें असा आहे.

जातां येतें = गन्तुं ईयते

खातां येतें = खादितुं ईयते

तात्पर्य, येणें संभावनार्थक ईयते ह्या कर्मणि क्रियापदापासून निघतो. हा येणें धातु ज्ञायते पासून निघणाऱ्या ये धातूहून निराळा आहे.

( ४० )

एया लागि सुमनु आणि शुद्धमति ।
जो अनिंदकु आणि अनन्यगति ।
पैं गोप्य परि तेया प्रति । चावलिजे ॥

चावलिजे = संवल्ह्यते, संवल्यते, संवूयते.

संस्कृत

एतस्य अर्थं यः सुमनाः अन्यच शुद्धमतिः
अनिंदकः अन्यच अनन्यगतिः ( अस्ति )
तं प्रति गोप्यं अपि संवल्ह्यते ।

अर्वाचीन मराठी

एतदर्थ जो सुमन आणि शुद्धमति अनिंदक आणि अनन्यगति ( आहे ) त्या प्रत गोप्य हि संपूर्ण सांगितलें जातें.

टीका

चॉवलिजे हें रूप संवल्ह्यते = सावल्जिजे = चॉवलिजे, असा परंपरेनें आलें आहे. संभूपासून हि हें कर्मणिरूप निघालें असेल. ब्रूचें कर्मणि उच्यते देतात. परंतु पूर्ववैदिक भाषेंत किंवा पाणिनिकालीन प्रातिक भाषेंत ब्रूयते किंवा ब्रव्यते असीं रूपें होत असलीं पाहिजेत. ब्रूचीं हीं रूपें दुसऱ्या वच्, वद् वगैरे समोच्चारित धातूंच्या रूपापुढें फिकीं पडून गेलीं असावीं. मराठींत जाणणें या क्रियापदाचें कर्मणि येणें हें रूप होतें. हें जाणण्यास जसे मराठी वैय्याकरण विसरले, तसा च प्रकार येथें झालेला दिसतो.

( ४१ )

तरि प्रस्तुत आतां गुणीं इहीं । तुज वांचूनि आनु नाहीं ।
म्हणौनि गुज तन्हीं तुझां ठाइं । लपौं नेए ॥

संस्कृत

तर्हि प्रस्तुतं अधुना एभि गुणैः ( युतः )
त्वां विना अन्यः नास्ति ।
( इति ) मत्वा गुह्यं तर्हि त्वदीये स्थाने
लेपयितुं न ईयते ।

( इति ) मत्वा, सेवितुः किल त्वां चटुतां स्मरामः
यर्हि अनन्यः ( सेविता ) मिल्यते।

अर्वाचीन मराठी

आगा ! यानांत दूध गूड असतें खरें, पर यानाला च कांहीं त्याची गुळणी होत नाही. म्हणून ( दूध ) सेवन करणाऱ्याची चाड वाटते, जर अनन्य सेवन करणारा मिळेल.

टीका

किल = किर, किड, कीड, कीं, की-इतके अपभ्रंश एका किल शब्दाचे होतात.

( ३९ )

मूढांहूनि विं काढिलें। मग निरोलिलिये भुइं पाखिरिलें।
तरि तें सांडीविखुरी गेलें। ह्मणों ये काइ॥

मुडा = मूतः = , मूतकः
मूत ह्मणजे बांधलेला गठ्ठा. पाटी.
मू ( बंधने मूतः = मूडा = मुडा.
निरोलिलिये = निर्वापितायां, निर्वेळितायां.
पाखिरिलें = प्रकीर्णं.
सांडी = स्यंदनी, स्यंदा, स्यंदी, स्यंन्दू-प्रस्रवणें.
विखुरी = विक्षुरी.

संस्कृत

मूतकेभ्यः बीजं कर्षितं माङ् निर्वापितायां भूमौ प्रकीर्णं;.
तर्हि तत् स्यंदनविक्षुरणेन गतं ( इति ) भणितुं ईयेत किं ?

अर्वाचीन मराठी

मुड्यांतून बीं काढिलें ( आणि ) मग मशागत केलेल्या नांगरलेल्या भूमींत पाखरिलें; तर तें सांडीविखुरी वारी गेलें ( असें ) ह्मणूं येईल काय ?

टीका

१ विष्किर पासून विखिरणें होईल. क्षुरप्र ( खुरपें ) यांत क्षुर शब्द आहे. सबब विक्षुर पासून विखुर शब्द निघालेला समजणें युक्त आहे.

२ ईयेत ( कर्मणि ) ह्या क्रियापदाचा अर्थ संभवणें असा आहे.
जातां येतें = गन्तुं ईयते
खातां येतें = खादितुं ईयते

३ सहस् = सहज. सहज म्हणजे शीघ्र.

४ नवं नवं, नवनवं, नव्य नव्यं = नावीं नावीं, नवें नवें नव्या नव्यानें Now & then.

५ केति = कियत् अव्यय

॥ ओवी २८० पहा, ७१ पहा वाचेक.

( ४३ )

परि तें चि ऐसेंनि निवाडें । जैसें भांसळलें सरें कुडें
मग काढिजति फाडे । वरि पारिखौनियां ॥

निवाडा = निर्वाड        भांसळलें = भ्रंशितं, भ्रष्टं.
फाडा = स्फटा

सस्कृत

परं तत् चित् ईदृशेन ( प्रकारेण ) निर्णयते
यादृशं खरं कूटं भ्रंशितं ( चेत् )
माड् (तानि) स्फटाया. उपरि परीक्ष्य (क्षराणि कूटानि) कृप्यन्ते।

अर्वाचीन मराठी

पर तें च अशानें निवडतें जसें खरें कुडें भेसळलें ( असतां ) मग ( तीं ) फाडा वर पारखून काढलीं जातात

( ४४ )

कां चांचोडाचेनि सांडसें । खांडिजे पयपाणी राजहंसें ।
तुज ज्ञानविज्ञान तैसें । वांटूनि देऊं ॥

संस्कृत

किंवा ( यथा ) चंचुपुटस्य संदंशेन ( संदंशेन )
पयःपानीये राजहंसेन खंड्येते
( तथा ) तादृक् ज्ञानविज्ञाने वंटयित्वा ददानि ॥

अर्वाचीन मराठी

किंवा जसें राजहंसाचें चांचोच्या सांडसानें दूध व पाणी खांडिलीं जातात, तसें ज्ञान ( आणि ) विज्ञान तुला वांटून देऊं.

अर्वाचीन मराठी

तरी प्रस्तुत आतां ह्या गुणांनीं ( युक्त ) तुज वांचून अन्य नाहीं, म्हणून ग्रंथ तरी तश्या ठिकाणीं लिपवितां येत नाहीं.

टीका

लिप्-लिम्प् व लप्-लम्प् हे धातू एकमेकांचें कार्य संस्कृतांत हि कित्येक स्थळीं करतांना आढळतात. उदाहरणार्थ, लेप्ड व लिप्ट. तो च प्रकार, अर्थात् आनुवंशिकत्वास्तव मराठींत होतो. लपला किंवा लिपला.

( ४२ )

आतां केती नावां नावां गूज ।
म्हणतां कानडें हान आवडैल तुज ।
तरि सांघौनि ज्ञान सहज । विज्ञानेंसीं ॥

कानडें = कर्णकटु.
कानडें = कर्णनाधं.
सांघौनि = संख्यानि.

संस्कृत

अधुना गुह्यं ( इदं इति ) कियत् नव्यं नव्यं ( नव्यनव्यं ) नवनवं भणिते ( सति )
हंत त्वां ( प्रति तत् ) कर्णकटु वावर्तिष्यते किंवा वावर्त्तेत ।
तर्न्हि विज्ञानेन समं ज्ञानं सहसा संख्यानि ।

अर्वाचीन मराठी

आतां गुह्य ( म्हणून ) किती नव्यानव्यानें सांगतां तुला ( तें ) कर्णकटु वाटेल हां; तरी विज्ञाना सह ज्ञान तुला सहज सांगूं का ?

टीका

१ कार्णाटकः या पासून कानडा असा जो शब्द निपजतो. त्याहून कर्णकटु पासून निघालेला कानड ( डा-डी-डें ) शब्द निराळा, हें सांगावयाला नको.

२ सांघौं—लोट् उत्तम पुरुष एकवचन. इ पादपूरक. सांघौं + इ = सांघौन् + इ = सांघौनि. ओंवी २८६ पहा. इ हें पादपूरक मराठींत कवितेंत फार योजितात. ज्ञानेश्वरकालीं गद्यांत हि योजीत. तसें च इ प्रमाणें उ हें हि एक पादपूरक आहे. सांघौं + उ = सांघौनु-सांघौनि-नु हीं क्नि-क्नु प्रत्ययान्त धातुसाधित अव्ययें निराळीं. वेहतिसावी ओंवी पहा.

३ सहस् = सहज. सहज म्हणजे शीघ्र.

४ नवं नवं, नवनवं, नव्यं नव्यं = नावां नावां, नवें नवें नव्या नव्यानें Now & then.

५ केति = कियत् अव्यय

ⓒ ओवी २८० पहा; ७१ पहा वाचक.

( ४३ )

परि तें चि ऐसेनि निवाडें । जैसें भांसललें खरें कुडें
मग काढिजति फाडे । वरि पारिखोनियां ॥

निवाडा = निर्वाह : भांसलले = भ्रंशित, भ्रष्ट.
फाडा = स्फटा

संस्कृत

परं तत् चित् ईदृशेन ( प्रकारेण ) निर्धेयते
यादृशं क्षरं कूटं भ्रंशितं ( चेत् )
माद् (तानि) स्फटायाः उपरि परीक्ष्य (क्षराणि कूटानि) क्षुप्यन्ते।

अर्वाचीन मराठी

पर तें च अशानें निरवतें जसें खरें कुडें भेसळलें ( असतां ) मग ( तीं ) फाडा वर पारखुन काढलीं जातात.

( ४४ )

कां चांचोडाचेनि सांडसें । सांडिजे पयपाणी राजहंसें ।
तुज ज्ञानविज्ञान तैसें । वांटूनि देऊं ॥

संस्कृत

किंवा ( यथा ) चंचुपुटस्य संदंशेन ( संडिशेन )
पयःपानीये राजहंसेन खंड्येते
( तथा ) तादृक् ज्ञानविज्ञाने वंटयित्वा ददानि ॥

अर्वाचीन मराठी

किंवा जसीं राजहंसानें चोचीच्या सांडसानें दूध व पाणी सांडिलीं जातात, तसें ज्ञान ( आणि ) विज्ञान तुला वांटून देऊं.

टीका

१ तादृक् हें निपात असतां संस्कृतांत अव्यय असतें. प्राय: जस व तस हीं संबंधक उभयान्वयी सर्वनामें असतात; विशेषत: वाक्यांच्या आरंभीं.

( ४५ )

मग वारेयाचा धारसां । पडला कोंडा नुरे चि जैसा ।
आणि अवकणाचा आपैसा । राशि जोडे ॥

धारसां = धारासारे. कोंडा = कुट्टः.
नुरे = न वर्वर्ति ( वृत् चा यङ् )
आपैसा = अल्पायासः जोडे = जुटति.

संस्कृत

माङ् वातस्य त्यस्मिन् धारासारे
पतितः कुट्टः यादृशः न वर्वर्ति चित्
अन्यच्च अवकणानां अल्पायासः राशिः जुटति ।

अर्वाचीन मराठी

मग वाऱ्या च्या धारासारात पडलेला कोंडा जसा उरत च नाहीं आणि अवकणांचा राशि ( मात्र ) अल्पायासानें जुटतो.

( ४६ )

तैसी जे विवंचना जाणितलेया चि साठिं ।
संसारु चि संसाराचिया गांठी ।
लाउनि वैसवी पाटिं । मोक्षश्रियेचां ॥

साठिं = सन्धि. पाटीं पट्टे.

संस्कृत

तादृक्, यया मीमांसनया ज्ञातया चित् सन्धि
संसारः चित् संसारस्य त्यस्यां ग्रंथ्यां लाययित्वा
मोक्षश्रियः पट्टे उपवेशयाति ।

अर्वाचीन मराठी

तसे, जी विवंचना जाणिल्या कारणानें संसार च संसाराच्या गाठी लावून मोक्षश्रिये च्या पट्टा वर बसविते.

( ४७ )

जेयां जाणणेया विद्यांचां गांवीं । गुरुत्वाची आचार्यपदवी ।
जें सकळ गुह्यां गोसांवि । पवित्रां राउ ॥

संस्कृत

यस्मै ज्ञानाय विद्यानां ग्रामे
गुरुत्वस्य स्या आचार्यपदवी दीयते ।
यत् सकलगुह्यानां गोस्वामी
पवित्राणां राजा ॥

अर्वाचीन मराठी

ज्या ज्ञानाला विद्यांच्या गावांत गुरुत्वा ची आचार्यपदवी ( दिली जाते ) जें सकलगुह्यां चा गोस्वामी ( आहे ) ( व ) पवित्रांचा राजा ( आहे ).

( ४८ )

आणि धर्माचें निजधाम । तेविं चि उत्तमाचें उत्तम ।
जेया येतां नाहीं काम । जन्मांतराचें ॥

तद्वत् = तेविं. येतां = जायमानाय.

संस्कृत

अन्यच, यत् धर्मस्य निजधाम
तद्वत् चित्, उत्तमस्य उत्तमं
यस्मै जायमानाय जन्मान्तरस्य त्यत् कर्म नास्ति ॥

*अर्वाचीन मराठी*

आणि जें धर्मा चें निजधाम ( आहे ) तस च उत्तमा चें उत्तम ( आहे ) जें एतां जन्मान्तराचें काम नाहीं.

टीका

जन्-जाय् पासून हि येणें म्हणून एक क्रियापद होतें.
इ = एणें ( to come )
ज्ञाय = येणें ( To be known )
जन्-जाय् = येणें ( To be born )

( ४९ )

मोटकें गुरुमुखिं उद्वैजत दीसे । आणि हृदयीं स्वयंभ चि असे जैसें ।
प्रत्यक्ष फावों लागे तैसें । आपैसेया ॥

मोटकें = मूतकं. उद्वैजत = उदियत्.
फावों = स्फायितुं.

संस्कृत

यादृक् मूतकं गुरुमुखे उदियत् दृश्यते
अन्यत्, हृदये स्वयंभु चित् अस्ति ।
तादृक् अल्पायासेन प्रत्यक्षं स्फायितुं लगति ।

अर्वाचीन मराठी

असें ( पूर्वी ) गुरुमुखांत घांचलेलें ( पुढें ) बाहेर निघतांना दिसतें आणि हृदयांत स्वयंभु च असतें; तसें अल्पायासानें ( तें ) प्रत्यक्ष फावूं लागतें.

टीका

फावणें = वाढणें.

( ५० )

तेविं चि पैं गा सुखाचां पाउटीं । चडतां येइजे एया भेटी ।
मग भेटलेयां कीर मीठी । भोगणेयां हीं पडे ॥

संस्कृत

पाउट = पादपीठं. चडतां = चर्यमाणें.
भेटी = अभ्यतना. मीठी = मिथितं.

संस्कृत

तद्वत् चित् त्वै अंग सुखस्य त्यस्मिन् पादपीठेन एनां
अभ्यतनां चरितुं ईयते ।
माङ् अभ्यातिते किल मिथितं भोजनीयेन अपि पद्यते ।

अर्वाचीन मराठी

तसें च बरा ! सुखा च्या पायरीनें या भेटीला चढतां येतें. मग भेटल्यावर भी भोगण्याला हि मिठी पडते.

